२०११०३१७१७२८१०००१

**पिंपरी चिंचवड महानगरपालिका विविध संवर्गात पदनिर्मिती करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
नगर विकास विभाग
शासन निर्णय क्र. पीसीसी ३००३/१५०६/प्र.क्र. २७८/नवि २२
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक - १६ जुलै, २००८

वाचा :- १) समक्रमाकांचा दि. १४ सप्टेंबर, २००५ चा शासन निर्णय.
२) आयुक्त, पिंपरी चिचवड महानगरपालिका, प्रशा/१अ/कावि/६६६/२००५, दि. २६/०९/२००५.
३) आयुक्त, पिंपरी चिचवड महानगरपालिका, प्रशा/२/कावि/४५४/२००६, दि. २१/०४/२००६
४) आयुक्त, पिंपरी चिचवड महानगरपालिका, प्रशा/१/कावि/२९४/२००६, दि. २१/०४/२००६
५) आयुक्त, पिंपरी चिचवड महानगरपालिका, प्रशा/१/कावि/२९५/२००६, दि. २१/०४/२००६
६) आयुक्त, पिंपरी चिचवड महानगरपालिका, प्रशा/१/कावि/७८६/२००६, दि. २१/०८/२००६
७) शासन निर्णय क्र. पीसीसी ३००३/१५०६/प्र.क्र. २७८/नवि २२ दिनांक - १० ऑक्टोबर, २००६.
८) आयुक्त, पिंपरी चिचवड महानगरपालिका, प्रशा/२/काचि/१५५२/२००८, दि.०७/०६/२००८ व त्यासोबतचे परिशिष्ट अ.

**प्रस्तावना-**

पिंपरी चिंचवड महानगरपालिकेच्या आस्थापनेवर विविध संवर्गातील खालील २५ पदे निर्माण करण्यास ती शासनाच्या अतिरिक्त संवर्गातून भरण्यात येतील या अटीवर या विभागाचे समक्रमांकाचे दि. १४ सप्टेंबर, २००५ च्या शासन निर्णयान्वये मंजूरी दिली आहे.

| अ.क्र. | पदनाम | वेतनश्रेणी | पदसंख्या |
|---|---|---|---|
| १. | कार्यकारी अभियंता (विद्युत) | १०६५०-१५८५० | ३ |
| २. | उपअभियंता (स्थापत्य) | ८०००-१३५०० | १२ |
| ३. | गट निदेशक | ६५००-१०५०० | १ |
| ४. | कॉम्प्युटर ऑपरेटर | ५५००-९००० | २ |
| ५. | उद्यान अधिक्षक | ६५००-१०५०० | १ |
| ६. | हॉर्टीकल्चर सुपरवाझर | ५०००-८००० | ६ |
| | | एकूण | २५ |

०२. महापालिका सभेचा ठराव व विधी समितीचे ठराव विचारात घेवून पिंपरी चिंचवड महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील विविध ६ संवर्गातील उपरोक्त २५ पदे शासनाच्या अतिरिक्त संवर्गाऐवजी महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील कार्यरत कर्मचारी /अधिकारी यांच्यातून पदोन्नतीने भरण्यास मान्यता देण्याचा प्रस्ताव आयुक्त, पिंपरी चिंचवड महानगरपालिका यांनी संदर्भाधीन पत्रान्वये शासनास सादर केला होता. त्यानुषंगाने दिनांक १० ऑक्टोबर, २००६ च्या शासन निर्णयान्वये उपअभियंता (स्थापत्य) १२ पदे, अधिक्षक - १पद, हॉर्टिकल्चर सुपरवायझर ४ पदे अशी एकूण १७ पदे पदोन्नतीने भरण्यास मान्यता दिली आहे. तसेच उर्वरित ८ पदांपैकी कार्यकारी अभियंता (विद्युत)- ३ पदे, गटनिदेशक- १ पद अशी २ संवर्गातील एकूण ४ पदे पदोन्नतीने आणि कॉप्युटर ऑपरेटर-२ व हॉर्टिकल्चर सुपरवायझर- २ अशी २ संवर्गातील एकूण ४ पदे सरळसेवेने भरण्यास मान्यता देण्याचा प्रस्ताव पुनश्च आयुक्त, पिंपरी चिचवड महानगरपालिका, यांनी संदर्भाधीन क्र. ८ येथील पत्रान्वये शासनास सादर केला आहे. त्या अनुषंगाने सदर प्रस्तावास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

आयुक्त, पिंपरी चिंचवड महानगरपालिका यांनी सादर केलेल्या प्रस्तावातील वस्तुस्थिती विचारात घेवून दि. १४ सप्टेंबर, २००५ रोजीच्या शासन निर्णयान्वये मंजूर केलेल्या २५ पदांपैकी ४ संवर्गातील उर्वरित ८ पदे शासनाच्या अतिरिक्त संवर्गातून भरण्याऐवजी ती आयुक्तांनी प्रस्तावित केल्यानुसार पुढीलप्रमाणे महानगरपालिकेच्या कर्मचारी/अधिका-यांमधून पदोन्नतीने /सरळसेवेने भरण्यास मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम १९४९ च्या कलम ५१(४) अन्वये शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | पदनाम | वेतनश्रेणी | भरती पध्दत | पदसंख्या |
|---|---|---|---|---|
| ७. | कार्यकारी अभियंता (विद्युत) | १०६५०-१५८५० | पदोन्नती | ३ |
| ८. | गट निदेशक | ६५००-१०५०० | पदोन्नती | १ |
| ९. | कॉम्प्युटर ऑपरेटर | ५५००-९००० | सरळसेवा | २ |
| १०. | हॉर्टीकल्चर सुपरवाझर | ५०००-८००० | सरळसेवा | २ |
| | | | एकूण | ८ |

०२.    आयुक्त, पिंपरी चिंचवड महानगरपालिका, पिंपरी यांनी प्रस्तुत प्रकरणी सर्व संविधानिक बाबींची पुर्तता करुन त्यासंबंधीचा अहवाल शासनास पाठवावा.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या नावांने व आदेशानुसार,

( सुनिल कोठेकर )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति,

१) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई ३२.
२) प्रधान सचिव, (२) (नवि), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
३) आयुक्त, पिंपरी चिंचवड महानगरपालिका,पिंपरी, पुणे.
४) निवडनस्ती, नवि २२
५) कक्ष अधिकारी (संगणक शाखा) न.वि.वि. मंत्रालय, मुंबई-३२

C:\P I M P A R I C H I N C H A W A D\POST CREATION\Executive Eng. Ele. G.R..doc